भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील मुख्य खोदन अभियंता (गट-अ) या पदावरील तात्पुरती पदोन्नती...

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आपना-०२२१/प्र.क्र.१६०/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई-४०० ००१.
तारीख: १८ फेब्रुवारी, २०२२

**शासन निर्णय-**

मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग/१६-ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार व दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णय प्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून यासंदर्भात मा.न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून, श्री. एच.एस.ढोकळे, वरिष्ठ खोदन अभियंता, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना मुख्य खोदन अभियंता (गट-अ) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे. श्री.ढोकळे यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ५ मध्ये दर्शविलेल्या कार्यालयात करण्यात येत आहे.

| क्र | अधिकाऱ्याचे नाव व सध्याचे पदनाम | सध्याचे कार्यालय | पदोन्नतीचे पद | मुख्य खोदन अभियंता पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना केलेले कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.एच.एस.ढोकळे वरिष्ठ खोदन अभियंता. | प्रादेशिक उपसंचालक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे | मुख्य खोदन अभियंता, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे | मुख्य खोदन अभियंता, संचालनालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे |

०२. सदर अधिकाऱ्याची मुख्य खोदन अभियंता पदावरील तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) सदर अधिका-याविरूध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही

ब) वरील अधिकाऱ्याची सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

क)दिव्यांग कर्मचा-यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील दाखल रिट याचिका स्टँप ६८१९/२०२१, दि.८.७.२०२१ व दि.२२.७.२०२१ रोजी दिलेल्या आदेशाच्या अधिनतेने तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

ड)या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्याला नियमितपणाचे पदोन्नतीचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत..

०३. सदर अधिकाऱ्यांना महाराष्ट्र शासकीय गट-अ, व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप सुधारणा नियम, २०२१ नुसार महसुली विभाग वाटप लागू होत नाही.

०४. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याला संबंधित कार्यालयाने तात्काळ कार्यमुक्त करुन शासनास कळवावे. तसेच पदोन्नत अधिकाऱ्याने पदस्थापना केलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१८१५३५००७९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, serialNumber=1325a2533f628572438b5fb711c805de49788678b97015bb0cac990e3b375423, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2022.02.18 17:59:41 +05'30'

**(गणेश पवार)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग), मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.
९. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
१०. उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (सर्व), मंत्रालय, मुंबई.
१२. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३. संबधित अधिकारी, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (संचालनालयामार्फत).
१४. सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालय प्रमुख/ विभाग प्रमुख.
१५. निवडनस्ती, कार्यासन पापु-१५.